# बकुळीचीं फुलें.

## १

केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर

संगमनेर.

# बकुळीचीं फुलें.


लेखक

केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर

संगमनेर







प्रकाशक—के. ल. टेंभुर्णीकर.

मु. संगमनेर, जि. नगर.

मुद्रक—अच्युत चिंतामण भट, यशवंत प्रेस, पुणें.

सन १९२२

जगत्कमल हें फुललेलें
सुधामरंदें भरलेलें,
        रसिक भ्रमरा
        तुषार प्यारा
        जीवच दुसरा
हंसोत कुणि त्या हंसणारे
पंकीं दर्दुर रमणारे !

# समर्पण.

( दिंडी )

करुनि माळा या बकुलफुलांची ही,
हिंददेवीच्या चरणिं मुदें वाहीं.
स्फूर्ति शांती मज देत जिचें नाम,
तीच काव्या या देउ चिर विराम ! १

( शा. वि. )

ध्यातां पाय जिचे नितांत, उठल्या ज्या स्वैरवृत्ती मनीं-
त्यांचीं गोड लहान सुंदर फुलें हीं गुंफिलीं वेंचुनी;
देतों अर्घ्य, जसें नदींतिल जलीं, घेऊनिया तज्जल,
माता भारतिचें तिच्याच चरणीं अर्पी तसें हें फल. २

के. ल. टेंभुर्णीकर.
संगमनेर.

# मनोगत.

माझे बालमित्र रा. रा. य. ल. दिवे, एम्. ए. यांच्या अकृत्रिम व निस्सीम प्रेमरूप वर्षाऋतूंत प्रथमतः माझ्या हृदयोद्यानांत काव्याचें बीजारोपण झालें. नंतर कै. बालकवि ठोमरे हे अहमदनगरास असतांना त्यांच्या दोन वर्षांच्या प्रेमळ सहवासांत त्यांच्या काव्यविषयक विचारांचें जीवन त्या काव्यबीजास मिळून त्यास अंकुर फुटूं लागला! तो अंकुर वाढीस लागल्यानंतर त्यास साळून-खुडसून व्यवस्थित करण्याचें सर्व श्रेय सन्माननीय गुरुवर्य रा. रा. दे. भा. लेले, बी. ए. यांजकडेसच आहे. त्यावर जीं कांहीं चिमुकलीं फुलें आलीं, तीं 'धर्मजागृति' द्वारा श्री. रा. ब. ग. खापर्डे यांनीं पुढें आणलीं व त्यांनींच कांहीं फुलें एकत्र करून सुंदर प्रस्तावनेच्या पेल्यांत घातलीं. तो बकुळीच्या फुलांचा पेला मी कृतज्ञतायुक्त अंतःकरणानें हिंददेवीच्या चरणीं समर्पण करीत आहें. वर निर्दिष्ट केलेली परिस्थिति अनुकूल नसती तर फूल कसचें, पण बीज देखील नसतें! यांत माझें कांहींच नाहीं असें सुज्ञ वाचकांचे ध्यानांत आल्यावर मग मीं कुणाचे व कसे आभार मानायचे? मात्र हें मनोगत सांगतां सांगतां कै. बालकवींची प्रेमळ आठवण होऊन, काळाचा मुका मार बसायला लागतो व लिहावयाचें कांहींच सुचत नाहीं!

केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर.
मु. संगमनेर.

ॐ

# प्रस्तावना.

काव्य हा कांहीं लोक समजतात तसा नुसता रमणीय विषयच नसून, जगांतील दगदगीनें थकल्या भागलेल्याला संध्याकाळीं विश्रांति देणारा नुसता एक बगीचाच नसून, जीवात्म्याच्या उन्नतीला आवश्यक असलेल्या गोष्टींपैकीं एक गोष्ट आहे. शरीर, मन, अन्तःकरण व आत्मा, मिळून मनुष्य बनलेला आहे. म्हणून शरीरासाठीं जितकी व्यायामाची व आरोग्यशास्त्रांची गरज आहे, मनासाठीं जितकी नीतीची व तत्वज्ञानाची गरज आहे, आत्म्याच्या कल्याणासाठीं जितकी धर्माची व अध्यात्माची गरज आहे, तितकीच अन्तःकरणाच्या परम कल्याणासाठीं मनुष्यसृष्टींत काव्याची व ध्येयाची गरज आहे. या चारी जोडया अगदीं सारख्या आहेत, व यांतील दुकली समानार्थक आहेत. काव्य व ध्येय ही जोडी हा अन्तःकरणाचा व्यायाम व आरोग्यशास्त्र आहे, अन्तःकरणाची नीति व तत्वज्ञान आहे व अंतःकरणाचा धर्म व अध्यात्म आहे. प्रत्येक ध्येय हें त्या त्या मार्गांतील किंवा विषयांतील माणसानें किंवा समाजानें आपली सर्व तर्कशक्ति खर्च करून अत्युत्तम ठरविलेल्या मार्गांतील आपली सर्व कल्पनाशक्ति—म्हणजे काव्य–खर्च करून ठरविलेलें, शेवटलें स्वप्न आहे किंवा काव्य आहे; आणि ध्येयावांचून मनुष्याची, समाजाची, किंवा राष्ट्राची उन्नति होणें शक्य तरी कसें आहे ? वरील चारी दुकली आपआपल्या विषयांत नसतील तर त्यांच्याशीं संबंध असलेल्या मनुष्यप्राण्यांतील त्या त्या घटकांची जी गति होईल, तीच मनुष्यसृष्टींतून काव्य नाहींसें केल्यास मनुष्याच्या अन्तःकरणाची होईल. असें असल्यामुळेंच खरें थोर काव्य हें नेहमीं ध्येयभूत बीजापासून किंवा निदान उत्कट बीजापासून आणि अंतःकरणांतील भावनांच्या व कल्पनाशक्तीच्या बारुदखान्यावर प्रतिभेची किंवा स्फूर्तीची ठिणगी पडून मोठ्या धडाक्यानें किंवा लीलेनें निर्माण झालेलें

असतें, व असलें पाहिजे; आणि कांहीं तरी एक ध्येय निर्माण करणें हाच अशा अंतःकरणाच्या किंवा कल्पनाशक्तीच्या लोकोत्तर उद्रेकांचा हेतु असतो आणि असला पाहिजे. ह्मणजेच ध्येयभूत कांहीं तरी निर्माण करणें हेंच काव्याचें प्रातव्य आहे. अशा रितीनें काव्य हें ध्येयांतच निर्माण होतें व ध्येयांतच त्याचें पर्यवसान आहे. ध्येय हेंच खऱ्या काव्याचें बीज आहे व ध्येय हेंच खऱ्या काव्याचें फळ आहे. ध्येयभूत कल्पनांच्या विस्तीर्ण सागरांतच काव्याची ऊर्मि उत्पन्न होते, व त्याच सागरांत ती शेवटीं लय पावते. आणि ध्येय कल्पनांची उर्मि ह्मणजे काव्य, हें काव्याचें लक्षण अस-ल्यामुळेंच सौंदर्य हेंच नाइलाजास्तव होऊन बसतें. तेव्हां या परंपरेनें विचार करीत आल्यामुळें काव्याचे घटक, काव्याची व्याख्या, काव्याचें स्वरूप, व काव्याचीं उत्पत्तीस्थानें व लयस्थानें, त्याचें बीज व त्याचें फल, त्याचा हेतु व त्याचें साध्य, व काव्याचें मनुष्यसृष्टींतील किंवा जीवाच्या उत्क्रांतींतील कार्य, हीं सर्व आपल्याला थोडक्यांत सांपडलीं.

या कल्पना व ही व्याख्या घेऊन चाललें ह्मणजे कांहींएक पाश्चात्य पद्धतीविषयीं व आपल्याकडे अलीकडे सुरू झालेल्या त्याच्याच अनुकरणा-विषयीं बरेच आक्षेप उत्पन्न होतात; पण त्यांचा आज येथें विचार करा-वयाचा नाहीं. तसेंच " रंडागीतानि काव्यानि " असें ह्मणणारे कांहीं जने व नवे तर्ककर्कश लोक व इतरही काव्याचे हाडवैरी, यांच्या आक्षेपांचेहि येथें आपणांस विवेचन करावयाचें नाहीं. कारण हे मनुष्याचा साकल्यानें विचार करणारे लोकच नव्हत.

तेव्हां थोडक्यांत लिहिण्याकरतां केवळ सूत्ररूपानें वर दिलेली काव्याची रूपरेषा व व्याख्या घेऊन ती माझे कविमित्र रा. केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर यांच्या कवितेस जर लावून पाहिली, तर त्यांची कविता आज नांवाजलेल्या म्हणून गणल्या जाणाऱ्या बऱ्याच कवींच्या कवितेपेक्षांही सरसच ठरतें याविषयीं माझ्या मनास तरी तिळमात्रही शंका नाहीं. प्रस्तुत पुस्तक

वाचिलें असतां या गोष्टीची खात्री पटण्याजोगीं असल्यामुळें याविषयीं जास्त लिहिण्याची जरूर नाहीं. " चंद्रोदय " वगैरे कवितांवरून त्यांची स्फूर्ति, " वसंतास " " स्वयें मरण मी पाहें माझें." " रजनीस " वगैरे कवितांत त्यांचें उत्कट भावना वर्णन करण्याचें सामर्थ्य, " मुरली " " मुरलीधरास " वगैरे अत्यंत मनोहर कवितांतील त्यांचें भक्तिपूर्ण अंतःकरण व मनाचे कोमल विकार व्यक्त करण्याचें कसब व "धन्य भरतमाता" ' पिता धन्य तो हिंदभू—जागृतीचा,' ' कुठें ती भवानी तलवार ? ' वगैरे कवितांवरून त्यांची जिव्हाळयाची देशभक्ति, हे गुण सहज दिसून येतील. याशिवाय कल्पनाशक्ति व सहज गोड रचनेचा प्रसाद तर त्यांच्या कवितेंत सर्वत्रच आहे. त्यांचे सर्व विषय थोर, उदात्त किंवा गंभीर असेच आहेत, त्यामुळें सौंदर्याची भक्ति त्यांस कोठेंही सोडावी लागलेली नाहीं. विषयी कविता लिहिल्यावांचून काव्यच होत नाहीं, अशासारखी कल्पना झालेल्या कांहीं आधुनिक कवींनीं या पुस्तकांतील काव्यविषयांची यादी पहाण्यासारखी आहे. अशा रीतीनें रा. टेंभुर्णीकरांप्रमाणें स्फूर्तीच्या ठिणगीनें अंतःकरणाचे व कल्पनाशक्तीचे सौंदर्यसंपन्न उद्रेक अनुभवण्याचें ज्यांचें भाग्य असतें, त्यांनीं कविता लिहिणें हें त्यांचें कर्तव्यच आहे, व हेंच त्यांचें सृष्टींतील ईश्वरानें नेमून दिलेलें कार्य आहे, असें माझें खरोखरीच मत आहे. व म्हणून रा. टेंभुर्णीकर आपल्या काव्यमय ' बकुळीच्या फुलांचा ' हा सुंदर गुच्छ छापून काढीत आहेत हें पाहून मला फार आनंद होत आहे.

रा. टेंभुर्णीकरांचा व माझा गेलीं पांच सहा वर्षें कवितेविषयीं जरी पुष्कळ पत्रव्यवहार झाला असला, तरी त्यांची माझी प्रत्यक्ष भेट दोन तीन वेळांच झाली असूनही त्यांनीं प्रेमळपणें हें प्रस्तावना लिहिण्याचें काम मजकडे दिलें याबद्दल त्यांच्या प्रेमळ अंतःकरणाचे आभार मानून हा प्रस्तावनालेख पुरा करतों.

अमरावती, वऱ्हाड १३-९-१९२१. —बळवंत गणेश खापर्डे.

# अभिप्राय.

माझे मित्र रा. रा. के. ल. टेंभुर्णीकर यांची काव्यमय 'बकुळीचीं फुलें' समग्र वाचून पाहिलीं. रा. टेंभुर्णीकर यांची कविता 'धर्मजागृति,' 'काव्यरत्नावली' वगैरे मासिक पुस्तकांच्या द्वारें आतांपर्यंत बहुधा सर्व काव्यरसिकांच्या चांगल्या परिचयाची झालेली आहे. कवितेचे विषय जरी विविध असले तरी त्या सर्वांचें पर्यवसान कोणत्या तरी उत्कट व गंभीर तत्त्वाच्या प्रतिपादनांत करावयाचें, हा माझ्या मतें रा. टेंभुर्णीकरांच्या रचनेचा विशेष दिसतो. त्या योगानें त्यांच्या कवितेला एक प्रकारचा रम्य भारदस्तपणा आला आहे. या रचनाविशेषाचेंच दुसरेंही एक स्वरूप आहे; किंवा त्याला रचनाविशेषाचें स्वरूप असें न ह्मणतां त्यांच्या काव्यप्रवृत्तीचें मूळबीज असेंच नांव देणें अधिक सयुक्तिक होईल. हें मूळबीज त्यांच्या काव्यरचनेवरून अध्यात्मपर विषयाकडे रा. टेंभुर्णीकर यांचा दिसून येणारा स्वाभाविक ओढा हें होय. कित्येकवेळां कवीच्या अंगीं वस्तुतः वास करणारी, किंवा पुष्कळदां आपल्या ठिकाणीं जिचा वास आहे असा त्यास नुसता आभासच होत आहे असें वाटविणारी कवीची आध्यात्मिक विषयांची आवड, ही त्याच्या काव्यास अस्पष्ट व अनुभूतिशून्य आणि ह्मणूनच सहृदय वाचकांस सहसा व सहजासहजीं न समजणारें व न पटणारें असें रूप देण्यास कारणीभूत होतें. सुदैवानें रा. टेंभुर्णीकर यांच्या काव्यरचनेंत असा प्रकार झाल्याचें दिसून येत नाहीं. त्यांची आध्यात्मिक विषयाची आवड, त्यांच्या रचनेंतील काव्यगुणांस मारक अशी झाली नसून, त्यांच्या कवितेंतील विषयप्रतिपादनाचा योग्य विकास व उठाव करण्यास, आणि तद्वारा त्यांच्या अंगीं वसणाऱ्या विशिष्ट काव्यप्रवृत्तीचें सहृदय काव्यभोक्त्यांकडून योग्य चीज करविण्यासच ती साधनीभूत झाली आहे. ही विशेष अभिनंदनीय गोष्ट होय. 'एकतार,' 'मुरलीधरास,' 'स्वयें मरण मी पाहें॰' व 'धन्य भारतमाता' या कवितांत रा. टेंभुर्णीकर यांची अध्यात्मविषय-

पर प्रवृत्ति विशेष उत्कट व उज्वल स्वरूपांत दिसून येते, व तिचीच उत्कट सगुणभक्तिमिश्रित छाया 'गोपीगीत' वगैरे श्रीकृष्णासंबंधाच्या कवितांत दिसून येते. 'पंजरस्थ विहग,' 'रानफूल,' 'जाळ्यांत सांपडलेली हारिणी' या कवितांत अनुक्रमें स्वातंत्र्य, बंधुता, समता व अहिंसा या मानवी जीवितांतील उदात्त तत्त्वांचें थोडक्यांत चटकदार व रम्य ध्वनियुक्त दिग्दर्शन झालें आहे. 'जाळ्यांत अडकलेल्या हरिणीचे उद्गार' ही कविता तर तिच्यांतील उत्कट करुणरसामुळें विशेष हृदयस्पर्शी झाली आहे. रा. टेंभुर्णीकर यांची भाषाशैली सामान्यतः प्रौढ आहे, परंतु दुर्बोध संस्कृत-शब्द, क्लिष्ट समास किंवा दूरान्वयी कल्पना यांनीं विरहित अशी आहे. तसेंच नव्या, जुन्या, शाहिरी, मुसलमानी वगैरे धर्तीच्या शब्दांची पूर्वपरंपरा, त्यांचे खरे अर्थ आणि काव्यरसदृष्ट्या त्यांच्या उपयोगाची युक्तायुक्तता वगैरे गोष्टींचा सारासार विचार न करतां केवळ नावीन्याच्या किंबहुना नादलुब्धतेच्या भरीं भरून जी सब्‌बिसमिल्लावजा पंचभेळ खिचडी करण्याची अलीकडील कविवर्गांपैकीं बऱ्याच कवींच्या ठिकाणीं शोचनीय प्रवृत्ति दिसून येते, तीस रा. टेंभुर्णीकरांची भाषाशैली फारशी बळी पडलेली दिसत नाहीं, ही समाधानाची गोष्ट होय. आमच्या समोर असलेलीं फुलें त्यांच्या नांवाप्रमाणें थोडीं व लहान लहान आकाराचीं आहेत, तेव्हां त्यांच्या मानानेंच वरील विधानांचाही अर्थविस्तार समजावयाचा हें उघड आहे, आणि म्हणूनच या बकुळीच्या फुलांचा एकत्र वास घेऊन पाहिला असतांही रा. टेंभुर्णीकर यांची कविताशक्ति बरीच चांगल्या दर्जाची आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. त्या कवनशक्तीचा अधिकाधिक विकास व उत्कर्ष होत जाऊन रा. टेंभुर्णीकर यांच्या हातून उत्तरोत्तर रम्य व परिणत स्वरूपाची श्रीशारदोपासना नित्य घडत राहो असें मी इच्छितों.

**श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर,**

एम्. ए. एल्‌एल्. बी. प्रोफेसर–डेक्कन कॉलेज, पुणें.

## अनुक्रमणिका.

श्रीसिद्धिविनायकाय नमः

# बकुळीचीं फुलें.

## ( १ )

### ईशनमन.

भुजंग. नमो सच्चिदानंदमूर्ते गणेशा !
नमो सत्यसंकल्पदात्या परेशा !
नमो सिद्धिनाथा ! नमो ज्ञानमूर्ते !
जगत्कामपूर्ते ! नमस्ते नमस्ते ! १

वसंतति. त्रैलोक्यनायक विभो जगदेकराया !
सर्वेश्वरा रविकुलोद्भव रामराया !
आधार तूंच असती शरणागतास
भावें नमस्कृति असो पदपंकजास ! २

## ( २ )

### श्रीगुरूचे चरणारविंदीं.

( साकी )

परमोदारा करुणागारा जगद्गुरो हे नाथा !
दीनपालका, निद्रावश कां होसी ? वद वद आतां. १

सहस्ररश्मि स्वधर्मसूर्या अधर्मतिमिरें पुरतें
ग्रासियलें गा! गगनभुवनही कृष्ण जाहलें बघ तें ! २
तमोविमोहित मनुज होय, जो असुनि स्वयें देवांश
दूर झुगारी देवपणाही, भासे तो असुरांश! ३
असुरकृतीच्या कृष्णपटाचें जगा वसन तो घाली
स्वयें बंधुता विसरुनि करिही तमःपटांतरिं केली. ४
लोहकांचनासाठीं, खंडासाठीं त्या भूमीच्या,
निजबंधूचें रक्त ओपितो लोभद्वेषपिशाच्या. ५
कृष्णकर्मरत प्रबल निशाचर स्वैर येथ संचार-
करिती, गमतें विजयशालि हे होतिल कीं सर्वत्र. ६
जितजेतेही ‘ माझें माझें ’ करितां धुळींत जाती,
अनुज तयांचे, हाय हाय! परि मार्ग तोच कीं वरिती! ७
स्वार्थपरायण असुराकांक्षा विसरे सहिष्णुताही,
अमर्याद ती, जगताचें या खंड खंड करुं पाही ! ८
जगद्रूप हा हार हिऱ्याचा, प्रेमस्वर्णीं ग्रथुनी
प्रभुच्या कंठीं घालाया जो उचित, तीच ही अवनी- ९
ज्वालामुखिच्या प्रबलस्फोटें ध्वस्त जाहलेल्या त्या--
भेसुर खंगर राशीसम ही दिसते कीं नयना या. १०
जेथ फुलावा प्रेमशांतिसुखकल्पतरु स्वर्गीय,
तिथें माजली द्वेषवल्लरी घोर विषारी, हाय ! ११
भक्तिरसाच्या पुष्करणींतिल जल तेंवी सरताहे
सद्भावाचीं कमलें सुकलीं द्वेषविषाच्या दाहें ! १२

जिकडे तिकडे नैराश्याची छाया पसरे भारी
करुणासागर ! येई येई, पाठिव वा प्रतिहारी. १३
जगन्मंगला ! निबिड तिमिरिं या प्रभुच्या चैतन्याचें
किरण न येती, स्फुरे न चिन्हहि त्याच्या अस्तित्वाचें. १४
पाया सुस्थिर चिर धर्माचा पृथ्वीप्रासादाला
असे नसे हा संशय येई दुबळ्या या चित्ताला. १५
करुणासागर ! जगद्‌गुरो हे ! त्वरें धांव तूं ध्यावी,
चैतन्याची ज्योत उजळुनी विश्वामाजी दावीं ! १६
बंधुत्वाची जगा प्रतीती दावुनि, उज्वल त्यातें
त्वरें करावें, दाखवि चरणहि शरणागत जगतातें. १७
स्वधर्मसूर्यं करीं गुरुवरा ! धरा समुज्वल सारी
अमोघ सामर्थ्यानें त्याचें तिमिर करावें दूरी. १८
हृत्कमळें हीं सुकुनी गेलीं शुद्ध जीवनावीण,
वर्षुनि प्रेमामृतही, द्यावें जीवन त्यांस नवीन. १९
प्रेममरंदें सद्‌गंधितही जगदुद्यान करावें,
आत्मानंदें मनोभ्रमरही परमपदाप्रत न्यावे ! २०
अखंड अक्षय शाश्वत तळपे ज्योत स्वयंप्रकाशी
आत्म्याची जी, गोचर होवो तिमिरावृत नयनांसी. २१
प्रेमैक्याच्या तरुवेलींतें मधुर फळें शांतीचीं
यावीं सत्वर, करुणाजलधर ! विनति पदीं बालाची. २२



## ( ३ )

## वसंतास

( चाल—घुमव घुमव. )

विश्ववांच्छिता करुणावंता वसंतऋतुराया !
पापतापदुर्दैन्यदग्ध भूवरी त्वरें या या !
वृक्षवल्लरी बालबालिका भूमातेच्या या
वठल्या साऱ्या ! यावें यावें नव जीवन द्याया !
असुनि सुवर्णा दिसे विवर्णा भूमाता आतां
चिदंश तींतिल विलया जाइल, भय वाटे चित्ता !
शिशिर ऋतूचा शीत ताप ह्या पुरे, पुरें त्रस्त
झालें बघ किति म्लान विश्व हें दिसतें उध्वस्त !
तुजकडे लागले सगळे डोळे पहा—ऋतुवरा !
तूं स्निग्ध दृष्टिनें एकवार तरि पहा—ऋतुवरा !
कळवळुनि तुजासि काकुळती येतों पहा—ऋतुवरा !
अंत नको, हे वसंत ! पाहीं, पाठिव पिक दूत,
संदेश देशभर फिरविल तो कीं, ‘ ऋतुश्रेष्ठ येत ’ १

कुहूकुहूनें अणूंअणूंतुन येइल चैतन्य,
विश्वजीवना ! तुझ्या दर्शनें होइल भू धन्य.
म्हणेल कोणी खोटें यातें, कमलिनीस हेंच
सहज विचारा काय वाटतें अरुणदर्शनेंच !

नवयुवतीला पुसाचि अथवा दोहद होतांच,
काय वाटतें ? जीव नवा तिज येतो हें साच.
येतांच उषेला दिव्य रक्तिमा नवी–ऋतुवरा !
येईल, दिसेलहि भूवरती नवि छवी–ऋतुवरा !
चैतन्य मूर्त कीं येईलच या भुवीं–ऋतुवरा !
मुरलीला पिकरूप देउनी मधु माधव कीं स्वयें
तरूतरूंतुन फुलाफुलांतुन वाटे बाहिर ये ! २
सुधा माधवें असुरभयें जणुं चषकीं पुष्पांच्या
ठेवुनि, सेविति स्वच्छंदें सुर मिषेंचि भृंगांच्या !
आगमनें तव ऋतुराया ! युवयुवतिप्रणयांत-
वसंत येइल, दिसेल तैसा कविच्या प्रतिभेंत.
मंद सुगंधित मारुत विहरत निर्झरास गाया-
लाविल तव यश, येइ ऋतुवरा ! सत्वर ऐकाया.
क्षण अशा जगाचा विसर पडों दे तरी–ऋतुवरा !
बंधनीं मुक्तिचें सुख अनुभवुं दे तरी–ऋतुवरा !
साम्राज्य स्थापुंदे ऐक्याचें अंतरीं–ऋतुवरा !
गेहींगेहीं चित्तपिकांतुन मंजु मधुर सूर–
निघोत ! होवो जगभर उत्सव तेंवि तुझा थोर ! ३
वसंतचंद्रा ! सुधासिंचनें नव जीवन येवो
पापतापदुर्दैन्यदग्ध भूप्रती हाच लाहो.
प्राणिमात्र पशुपक्षी झाले जागृत या वेळीं
आत्मजिवाच्या सख्या माधवा ! वाजिव तव मुरली.

सुमनहारसंभार घेउनी वसुंधरा राधा-
बघे तुजकडे किती वेळ ही, 'क्षमस्व अपराधा'
ती कुडी, जीव तूं, तुजविण निर्जीव ती—ऋतुवरा!
आनंदाच्या कंदा तुजविण संभवती—ऋतुवरा!
सुमलता कशा? सौभाग्यचि तूं तिजप्रती—ऋतुवरा!
विश्ववांछिता! करुणावंता! ऋतुराया! यावें!
स्वयें लाविल्या वृक्षालागीं नवजीवन द्यावें. ४

(४)

## कवितादेवीस–



(पृथ्वी.)

अहर्निश तुझें जरी करितसें अये! चिंतन
परंतु अजुनी कसें मज न देसि गे दर्शन!
खरोखरिच गे पुरें बनविलेंस वेडें मला,
सदोदित किती तरी हुडकिलें सये! मीं तुला. १
स्वकीय जन सोडुनी भटकतों, तुला धुंडितों,
पिशासम जनीं वनीं उपवनीं सुखें हिंडतों;
स्वसौख्य त्यजिलें कसें, कृश शरीर झालें पहा!
अजून सदये! किती शिणविसी? नको प्राण हा! २
किती शिणविलें, किती रडविलें जरी तूं मला,
तुझे न चरणीं तरी खचित देह मीं अर्पिला;

कुबेर धन घेउनी मजपुढें जरी पातला,
शके न भुलवूं मला, तुजपुढें उणें तें मला ! ३
मदीय मन लोभलें विधिसुते ! तुझ्या दर्शनीं
नसे जगतिं याविणें खचित अन्य हेतू मनीं;
असे बहु चमत्कृतीयुत धरा, जरी देवते !
परी तुजपुढें अये ! मजसि तुच्छ ती वाटते ! ४
वसंतसमयीं मही कुसुमभूषणें लेतसे,
प्रसन्न अरुणोदयीं सुख मनीं बहू होतसे,
मला गमतसे सर्व विहगनिर्झरां घेउनी
वसंतयश गासि तूं तरुलतांतरीं बैसुनी ! ५
सुमें विकसतीं, लता तरुसवें मुदें डोलती,
विहंग दयितांसवें मधुर राग आलापिती !
प्रसन्नहृदयें कुणी अळबिती, कुणी बंदिती–
विलोकुनि अये ! तुझी रुचिर दिव्य रम्याकृति. ६
अशा समयिं मी जधीं हुडकण्या तुला जातसें
कुठें न दिससी, तुझें मजसि खास लागे पिसें !
प्रसाद न घडे तुझ्या सुखद दर्शनाचा जरी
कशास मग हें जिणें ? उगिच भार हा भूवरी ! ७
अहो कवि ! तिनें तुम्हां कधितरी दिलें दर्शन ?
रसज्ञ सरिते ! तुला शिकविलें कुणीं गायन ?
निसर्गकविंनो कुणा मधुर गातसां गायनें ?
वदा, मजसि दाखवा, विफल नातरी हें जिणें ! ८

असेल मरुता ! तिला कधिं तुवां कुठें पाहिलें,
कृपा करुनि सांग बा ! अखिल विश्व तूं व्यापिलें;
अहो, विनवितों तुम्हां, सकल देवतांनो ! किती
कृपा करुनि दाखवा, मजसि भेटवा ती सती ! ९
निवास तव शारदे ! कुणि न सांगती; सांग तो.
गरीब दुबळा कवी विनवितों, करां जोडितों,
प्रमाद घडला म्हणों ? करिशि कां अशी हेलना ?
किती विनविलें, दया अजुनि कां तुला येइना ? १०
विशाल गगनांगणीं, तव निवास तारांगणीं,
सुरेंद्रभुवनीं, मुनीजनगणींहि, विद्वज्जनीं,
अये ! विजन काननीं, परम दिव्य सिंहासनीं,
असे निकटवर्तिनी हृदयवासिनी ! या जनीं ? ११
जिच्यास्तव कसें तरी अजवरी जिणें कंठिलें
तिनेंच मग शेवटीं मजसि, हाय ! धिक्कारिलें !
जरी कुपित जाहली जननि अंध बाळावरी
तयें मरण वांछिलें नवल काय सांगा तरी ? १२

(५)

## धन्य भारतमाता.

( चाल—जरी कुणा श्रीमंताची० )

जगीं धन्य भारतमाता तीच एक जाणा
ज्ञानसूर्य अध्यात्माचा जिथें मावळेना ॥ ध्रु. ॥

आर्यभूमि प्रभुच्या कृतिचें विभव जगन्मान्य
साच असे, भारतमाता आमुचीच धन्य,
स्वर्णभूमि इजला वदती, थोर ही वदान्य,
मनुजरूप घेउन राही इथें देवराणा १

विभवशैलशिखरीं असती देश जरी कांहीं
नाशवंत वैभव त्यांचें, स्थैर्य तयां नाहीं,
ज्ञान भौतिकाचें सारें जरी त्यांस होई
अजुनि नसे अध्यात्माचें ज्ञान परि तयांना. २

क्षणिक विभव इहलोकींचें जयां सौख्यसार,
सांत जडसृष्टिमांतीं करिति जे विहार,
त्यां न कळे दिक्कालाच्या काय आरपार
त्याच दिव्य भूवर उभवी नित्य जी निशाणा. ३

हिंदुधर्म राखाया प्रभु जिथें जन्म घेई,
राष्ट्रधर्म शिकवाया जो प्रेषि दूत कांहीं,
मनुजधर्म सांगाया तो श्वास सोडि कांहीं,
शैलराज गाई जीच्या नित्य यशोगाना. ४

जलदजाल परवशतेचें आर्यभूत येई,
सूर्यतेज स्वातंत्र्याचें मंद तयें होई,
त्याच जलदवर्षावानें जीवन ये कांहीं,
स्वाभिमानसुरतरु तेणें मोहरला जाणा. ५

१ दिक्कालातीत दिव्य भूमीवर. २ वेद.

बालभानुकिरणें झालें रंजित पट ज्याचें,
जें निशाण स्वातंत्र्याचें, चिन्ह दिव्यतेचें,
दास्यतिमिरविध्वंसक तें आर्यभूकरींचें,
शत्रुशिरीं अज्ञानाच्या दिसे फडकतांना. ६
खनि अमोल नररत्नांची, स्थान दिव्यतेचें,
आदिपीठ सद्धर्माचें, धाम सुभगतेचें,
सकलदेशमालामेरू, द्वार स्वर्गभूचें
सगुण ब्रह्म श्यामल जेथें करि विहार नाना. ७

---

## ( ६ )

## हिंद्माता आणि कवि.

---

कविः—अमरसंस्तुते आर्यदेवते !
प्रिय तुला असें काय सांग तें—
ज्याचियाविना असासि दुःखिता ?
हिंद्माताः—ती स्वतंत्रता ! ती स्वतंत्रता ! १
कविः—शक्ति संपदा शौर्यधैर्यही
मुळिं नसे, कसें प्रिय मिळेलही !
श्रेयसिद्धिचा मार्ग कोणता ?
हिंद्माताः—असहकारिता ! असहकारिता ! २

---

## (७)

## एकतार.



### उत्तिष्ठत हो जागृत आतां.

( वृत्त पादाकुलक. )

अर्धजागृती अर्धसुषुप्ती–यांत तरंगत असतां वृत्ती
कोणिकडुनि तों कोठुनि कैसे–शब्द ऐकिले मीं, त्यासरसें
होउनि जागा बाहिर गेलों–चकित मनें मी पाहुं लागलों
एकतार तों वदे तत्वता-'उत्तिष्ठत हो जागृत आतां.' १

शिरीं जटेचा भार वाहुनी–रक्षा अंगालागिं फासुनी
झोळी भगवी छाटी लोटी–घेउनि हिंडे भिक्षेसाठीं
साधू ऐसा एक देखिला–स्कंधीं त्याच्या सुस्वर सरला
एकतार ती वदे तत्वता–'उत्तिष्ठत हो जागृत आतां.' २

फटफटलें बघ दिशा उजळल्या–तेजरसाच्या वाहुं लागल्या–
नद्या, त्यांमधें लीन होइं रे–जन्मसफलता हीच असे रे
तेजामाजी तेज मिळावें–दिव्यत्वाप्रत सत्वर जावें
एकतार ही थकली वदतां–उत्तिष्ठत हो जागृत आतां. ३

एकतार ती कर्णीं घुमली–हृदयाची तों तार हालली
डोलुं लागलों, नाचुं लागलों,–देहा विसरुनि शून्य जाहलों,
तेजोमय जग सर्व जाहलें–सत्यलोक मग अपाप दिसले
एकतार परि वदली बघतां--उत्तिष्ठत हो जागृत आतां. ४

सत्यलोकिंचे जनही सगळे--मी तूं भेदा विसरुनि गेले
परस्परांतें प्रेमसुधेचे -आग्रह करिती सात्विकतेचे
निर्मलतेचे, शुद्ध रसाचे--स्रोत वाहती अक्षयतेचे
एकतार परि वदे तत्वता--उत्तिष्ठत हो जागृत आतां. ५

इतुक्यामाजी एक विभूती--तेजरसाची केवळ मूर्ती
मजला वदली "दिव्य तूंच रे--सर्वव्यापी शुद्ध तूंच रे
ब्रह्मांडाइ बघ अवघें सारें--तुझ्यांत भरलें, अनंत तूं रे"
एकवार तों वदे गुंगतां--उत्तिष्ठत हो जागृत आतां. ६

'सार्वभौम तूं असुनी ऐसा--भिकारड्यासम फिरसी कैसा?
तुझी तुला नच ओळख पटली'--काय तयें मग जादू केली
मीपण माझें हरुनी नेलें--निमिषार्धीं मज दिव्य बनविलें,
एकतार परि वदे गुंगतां--उत्तिष्ठत हो जागृत आतां. ७

जिवाशिवाची भेट जाहली--तन्मय वृत्ती झाली, धाली.
दिव्यचि वारे, दिव्यचि तारे--दिव्य दिव्य मज दिसलें सारें
दिव्य देहही दिसूं लागला--दिव्यामाजीं जीव रंगला
एकतार परि वदे तत्वता--उत्तिष्ठत हो जागृत आतां. ८

कृष्णपणा तो कोठें गेला--छाया नुरली, भेद लोपला,
ममत्व सारें विलया गेलें,--बंधुत्वाचें भरतें आलें,
अखंड शांती तत्व बिंबलें,--सत्य सत्य हें ध्येय भासलें,
एकतार परि वदे गुंगतां--उत्तिष्ठत हो जागृत आतां. ९

अग्रदूत तूं माझा होईं–येतों येतों मी लवकरहीं
कानमंत्र जो तुजला दिधला–उपदेशीं तूं त्यातें सकलां
तनुमनवचनें स्वयेंचि वागें–अंतर्हित मग होई वेगें
एकतार तों वदे गुंगतां–उत्तिष्ठत हो जागृत आतां. १०

इतुक्यामाजीं जागा झालों–पुनरपि येथें कैसा आलों
ऐसें वदतों, तों मी पाहीं–एकतार ती, साधू तोही
अंतर्यामीं पटली खूण–समानशीलचि माझा जाण
एकतार तों वदे गुंगतां–उत्तिष्ठत हो जागृत आतां. ११

अग्नींतुनिया सुवर्ण जैसें–शुद्ध होउनी निघतें तैसें
सर्वांगी मी शुद्ध जाहलों–परस्परांतें भेटभेटलों
आपण करुं ये गुरुचें कार्य–प्रेमें वदला बंधूराय
एकतारही वदे गुंगतां–उत्तिष्ठत हो जागृत आतां. १२

भेटीसाठीं जीव भुकेले–तळमळ करितां व्याकुळ झाले
येइल केव्हां तो गुरुराणा–पाजिल केव्हां अमृतपान्हा
भाग्य असें कां या पतितांचें–दर्शन होइल काय तयाचें
एकतार ती वदे गुंगतां–उत्तिष्ठत हो जागृत आतां. १३

ब्रह्मांडाचा करुनि भोपळा–ज्ञानकळेची तार सोज्वळा
लावुनि, आत्मा छेडित बसला–एकतार, तो स्वयें गुंगला,
भुवन गुंगलें, गगन गुंगलें,–गोल गुंगले, विश्व गुंगलें
एकतार ती वदे गुंगतां–" उत्तिष्ठत हो जागृत आतां." १४

———

## ( ८ )

## गोपीगीत.

---

( चाल—वीरा भ्रमरा. )

१

चला साजणी नंदयशोदानंदकंदवंदना,
आळवूं करुणाघन मोहना.
प्रभातदेवी, वाहुनि त्यातें आकाशांतिल फुलें,
येतसे; शीत वात सूटले.
कुंजवनींचा श्रीरंगाचा मुरलीमंजुध्वनी
खगा ये नव गायन शिकवुनी;
न कळत सोडी भ्रमरा कमलिनि मंजुल रव ऐकुनी
जातसे तोहि तयामागुनी.
हीं स्मितसम सुमनें विकसित झालीं पुरीं,
दिक्पाल सिंचिती सुधा मधुर त्यावरी,
सृष्टीस येतसे दृष्टि, पहाया हरी,
श्यामलमूर्ती सुमनालंकृत राधेसह पाहुनी
चंद्रमा निष्प्रभ होई झणीं !

२

"कृष्णकृष्ण जय कृष्णकृष्ण" ही वदत मुखें चालली,
कृष्णता येई यमुनाजलीं;

अनंत जन्मीं अनंत मूर्ती वसत मनीं जी, चला
पाहुं या चर्मचक्षुनें तिला.
बाळगडी गोपाळ चालले घेउनिया गोधना
प्रभूच्या ध्याया शुभदर्शना.
या भूमिवरी ज्या मुरलिरवें आणिलें,
ज्या जीवें दिधले प्रतिरव त्यातें भले,
त्या प्रभुच्या संनिध नेइल रव तो त्वरें,
प्रेमभरें स्वानंदसागरा निर्झरिणीसम चला
भेटुं या भावबळें प्रेमळा.

३

हरिगुणगायक शुकसनकादिक वाल्मिक शौनक भले
अहर्निश यत्पदिं जे लागले,
पदकमलीं त्या मिलिंद होऊं, प्रेममरंदा लुटूं,
भ्रमरिसम पदकमला त्या झटूं.
धूप दीप मधुलेप अक्षता अर्घ्यपाद्य नव फुलें
नको त्या नैवेद्यहि चांगले;
सम्राट् असे जो सर्वांहि दात्यांतला
त्या सर्वाधीशा नलगे कांहीं चला
तो असे भुकेला प्रेमाचा सांवळा
मीपण घेऊं, तयांस वाहूं, भजूं, पुजूं त्याजला
कृष्णमय होऊं साऱ्या चला!

———

## ( ९ )

## भूपाळी.



एके दिवशीं गोपालकृष्णांस निद्रेंतून उठावयास थोडा उशीर झाला असतां माता यशोदा त्यांचेपाशीं जाऊन म्हणते—

( चाल—प्रिये पहा० )

जागृत हो व्रजभूषण--मुनिरंजन हृदयमोहना ! ॥ ध्रु० ॥
स्मितवदना सुप्रभात—विहगमुखें गीत गात,
अमृतसेक मधुर करित—येइ दर्शना. १
विकसित उडुकुसुमांहीं —भूषविली निखिल मही
दिग्युवतींनीं पाहीं—ऊठ मोहना. २
शुभकर दर्शन ध्याया—आल्या व्रजललना या
विनविति कर जोडुनियां—उघडि लोचना. ३
जय जय जय हे मुकुंद !—विश्वहृदयसुममरंद !
तव सेवनिं अम्हि मिलिंद--पुरविं कामना. ४
यादवकुलकमलरवे ! —अस्मत्हृत्सुमन जवें
विकसविं, जीवन द्यावें--नव, सुलोचना ! ५
भवसागरिं मुरलितरी, झाली कितिकांस तरी,
भवतीरीं जन ये, करिं—मुरलिगायना. ६
जाति धेनु कुंजवनीं--तृण न मुखीं घेइ कुणी
रव न पडत तच्छ्रवणीं—ऊठ मोहना ! ७
या, या, या कुंजवनीं—मुरलिरवें जग भारुनि
शांतरसीं बुडवा झणिं—सफल या जना ८

दुर्लभ निर्गुणदर्शन—म्हणुनि घेसि रूप सगुण
बघुं दे तें नयन भरुन--सकल व्रजजनां. ९
परिसाया मधुर वचन—उत्सुकलें बघ मन्मन
ऊठ, बोल मनमोहन—कमललोचना ! १०

---

## ( १० )

## मुरली.



श्रीकृष्णाच्या जगन्मोहिनी मुरलीची ऐकूं येण्याची वेळ अगदीं होत आलीच आहे; पण राधिकेस उत्कंठेमुळें प्रत्यक्ष ती ऐकूं येईपर्यंत धीर धरवत नाहीं, म्हणून ती त्यास विनवीत आहे—

( चाल — जागीये रघुनाथ. )

वाजिव तव मधुर मुरलि मोहन या कालीं
नंदलाल ! फेक एक गोड ती लकेरी ॥ ध्रु. ॥
तिमिरपटल विरल करित–मृदुल मधुर मुरलिगीत
ऐकाया ही प्रभात–सस्मिता उदेली. १
मंदानिल परिमलयुत–तृण वेली तरु झुलवित
हंसवित कीं, हंसत येत–करित ललित केली. २
पंचीजन मुरलिगान–ऐकाया एकतान
झाले, घे एक तान–ओत सुधा सारी ! ३
भेक नाग वैनतेय–विसरुनिया वैरभाव,
मुरलीस्तव घेति धाव–नवल न, ही आली ४

सेकपात्र तव मुरली–श्वासें तव अमृत झालि
दे तुषार वनमाली !–एक ही भुकेली. ५

मुरलीचे मधुर बोल–मम हृदयीं जाति खोल
कणकणांसि करित लोल–वाजिव वनमाली. ६

दग्ध वेलि पालवती–शुष्क फुलें फुल्ल होतीं
गिरिवरही पाझरती–ती किमियावाली. ७

वाजिव, तूं नंदलाल–मदिय हृदय धरित ताल
उन्मन × × × × — राधिका जहाली. ८

---

## ( ११ )

## मुरली ऐकल्यानंतर.

श्रीकृष्णाच्या भेटीस निघालेल्या एका बालगोपीनें वाटेंतच मुरली ऐकली. तिला जिकडे तिकडे मुरली ऐकूं येऊं लागली व दिसूं लागली. मुरलीश्रवणापासून होणाऱ्या आनंदापेक्षां प्रत्यक्ष दर्शनांत विशेष आनंद आहे, म्हणून ती श्रीकृष्णास दर्शन द्यावें अशी विनंति करीत आहे. परंतु तिच्या प्रेमाचा अंत पाहिल्याशिवाय श्रीकृष्ण तिला दर्शन देत नाहींत.

( चाल—अजि अक्रूर हा )

हे प्राणसख्या ! धांव ! भेट गोविंदा !
सच्चिदानंद सुखकंदा !
जधिं ऐकियली मीं तव मंजुळ मुरली
मुरलीमय वसुधा झाली !

या नेत्राचा दोष असे कीं काय ?
मुरलीमय तेजहि होय !
मुरलीची आवड मोठी
परि झुरते भेटीसाठीं
मज भेट देईं जगजेठी !
तव वचनसुधा जीवन मधु मम होई !
हा जीव भुकेला पाहीं ! १
मी विटलें या जगता, उपरति झाली,
मुरलींतच वृत्ती मुरली.
मम चित्ताचे कर्णा सूर न सात;
एकचि, जो शब्दातीत
तरु निर्झर कीं मूल फूल वायूही
तो एक सुरांतच गाई ।
कल, मंद्र, तार, सूरांचा
हृदयंगम संगम साचा
जाहला लयहि चित्ताचा
रव मुरलीचा शांतिप्रद ये श्रवणीं
परि लोभ जडे तव चरणीं ! २
मम हृदयाच्या कंदा जीवन घाली
ती सेकपात्र तव मुरली;
प्रत्यक्ष परी रविदर्शन ना होतां
तो कुसुमित होइ न, नाथा !

तें कुसुम नसे, गंध कोठुनी येई ?
मनभृंग भुकेला राही !
दे दर्शन जीवननाथा ।
किति बघसि अंत गुणवंता !
कासया शिणविसी श्रांता ?
आजि कवण्या मी शब्दें विनवूं सांगा
कां रुसलां हो श्रीरंगा ? ३

त्या बालेनें केला बहुतचि धांवा
परि तुष्ट कसा तो व्हावा ?
तो प्राणसखा शोधाया जंव जाई
ती यमुनातीरीं येई
तिज भानाचि तें जलस्थलाचें नुरलें
कृष्णानें वेडें केलें,
जंव जलांत पडली बाला,
श्रीहरी धांवुनी आला,
हृदयाशीं धरिलें तिजला;
तिज सांपडला आनंदाचा कंद
प्रेमाला वश गोविंद ! ४

———

( १२ )

# मुरलीधरास.

( चाल--चंद्रकांत रायाची. )

मुरलिधरा ! तूं अशीच वाजिव मोहन मुरली ती
अनंत जन्मीं श्रांत जाहल्या जीवा दे शांती; १
फिरफिर फिरलें अनेक योनी, अनुभव मज असला-
नाहीं आला, कुणि न भेटला मज मुरलीवाला. २
मी थोराची, भाग्य थोर मम, वठल्या आशेला-
पल्लव आला, जीवतरू मम नितांत मोहरला. ३
तुझ्या दर्शनें मनमोहन हे ! काय कथूं वाचे
हर्ष जिवाचा, जीव चहुंकडे ब्रह्मांडीं नाचे ! ४
जरामरण या देहा येइल, येउत ते पुढती !
अशा सुखाची अशीच येवो परि नित अनुभूती ! ५
सुधारसाचें सिंचन चाले देहकणांवर हें,
मधुर रसीं या समरस होणें कदा न मी लाहें ! ६
रसास्वाद मज व्हावा, व्हावें दर्शन, हें वेड
वाजवितांना मुरलि, पहावें मुख तें तव गोड. ७
नटनाटक तूं, बहुरूपी तूं, तुजला जाणावें.
मुरलिधरा ! मी सदैव इच्छी हें जीवेंभावें. ८
मुखचंद्रांतुनि मुरलीवाटे नादसुधा वाहो,
चित्तचकोरा मिळो सर्वदां हा जीवनलाहो. ९

कृष्णश्यामला जीवनचंद्रा! ज्योत्स्ना तव विमला,
त्वदाश्रया ही तव पदिं विनटे, धन्य करीं इजला. १०

---

## ( १३ )

## रजनीस.

कविमित्र कै. बालकवि त्र्यं. बा. ठोंबरे यांची मृत्युवार्ता ऐकून जी त्यांची शेवटची कविता ' रजनीस आवाहन ' म्हणून प्रसिद्ध झाली, त्या रजनीस—

( साकी )

' ये ये ये जगदेकमाउली! ये रजनी लवलाही '
बालकवीचें काकुलतीचें आवाहन तुज होई १
जननी! आलिस धावुन, परिसुन ती करुणामय वाणी,
" आनंदी आनंद " गडे परि बोल न येई श्रवणीं २
सृष्टिदेवता शांतिलता तैं धीरोदात्त गिरीही–
काळवंडले, बुडतां रवि जैं अदृश्याच्या डोहीं. ३
रजनीदेवी! तुला न दिसलें येतां येतां काय ?
पायदळीं त्वां म्हणुनि तुडविला बालकवीचा काय! ४
लगबग येतां हिरा तुटुनि कीं पडला तव कंठींचा
म्हणुनी नेशी वाग्देवीचा कंठमणी मोलाचा! ५
तेजोमय परि गंधहीन तीं उडुसुमनें नभिं सारीं,
रम्य सुगंधित शिशुकविसुम कां म्हणुनि रुचे तुज भारी? ६
नितांत सुंदर सोनेरी कविभूषण अटवुनि काय
कराल काळाच्या मुशींत, सुरलोकीं नेसी माय? ७

यथार्थवर्णन कामरूपिणी सृष्टिसतीकन्येचें
ऐकायाचें जगदीशा कां बालकवीच्या वाचे ! ८
कालभगिनि ! तूं म्हणुनी नेशी ? खुशाल त्यासह जाई !
सत्ता तूझी तद्देहावर, त्याच्या कृतिवर नाहीं ! ९
नितांत सुंदरतेची छाया नयनमनोहर सृष्टी
निरखित जातां शून्यमनें कीं शिणला श्रमला कष्टी– १०
बालकवीचा जीव; भेदुनी सुंदर छायापट तो,
सुंदरतेच्या दिव्य दर्शना जाई जननी ! कां तो ? ११
निसर्गसुंदर वसुंधरेवर वसंतऋतुराजाचा–
निवास नच चिरकाल, म्हणुनि कीं कविपिक आनंदाचा–१२
जाई, जेथें तरुवेली तें गुलाब कंटकहीन
जनन न पंकीं कमलाचेंही, वस्तू छायेवीण ! १३
अक्षयतेचें अमृतरसाचें जें कारंजें वाहे
जगदीशाच्या गगनांगणिं कीं जाऊन तेथें राहे ! १४
वाग्देवीनें क्षणभर केला विलास बालकरूपें–
भुवनीं, गगनीं करावया कीं जाई तारकरूपें ! १५
चिदानंदमय परमेशाचें व्यक्तरूप जग बघुनी
शाश्वत अव्यक्तहि कीं बघण्या जाई देहा त्यजुनी ! १६
कोठें जावो ! कोठें राहो ! स्थूलदृष्टिच्या आड
समर्थ नच तो स्वयें, काल वा, न्याया तत्कृति गोड. १७

---

* हें स्वतंत्र काव्य आहे. या काव्यांतील हा पहिला भाग असून, तो शिरोभागीं बालकवींचे 'आवाहनांतील' एक चरण घालून सुरू केला आहे.

( १४ )

'पिता धन्य तो हिंदभूजागृतीचा.'

( भुजंगप्रयात )

जधीं संगरीं पार्थ हो मोहमूढ
तदा जो स्वयें बोधि त्या योग गूढ
असे अंश जो त्याच योगेश्वराचा
पिता धन्य तो हिंदभू–जागृतीचा. १
स्वधर्मच्युतांलागिं गीतारहस्य
वदे जो पुन्हां, साच तें योगभाष्य
स्वधर्मींचि जातां झिजे देह ज्याचा
पिता धन्य तो हिंदभू–जागृतीचा. २
परार्थास जो स्वार्थ मानी सदाही
जया लोकसेवा स्वसेवा असे ही,
फलाशा न ज्या लेश वा खिन्नतेचा
पिता धन्य तो हिंदभू-जागृतीचा. ३
खऱ्या केसरीचा धरी नित्य बाणा,
मदोन्मत्तभूपालदूतेभमाना--
धराया धजे, धैर्यमेरूच साचा,
पिता धन्य तो हिंदभू–जागृतीचा. ४
स्वयें कर्मयोगेंचि विज्ञानराशी
खरा मार्ग तो दाखवी पूढिलांसी;

स्वराज्यार्थ सारा खटाटोप ज्याचा,
पिता धन्य तो हिंदभू-जागृतीचा. ५

नको भृत्यशाही, हवी लोकशाही,
तयानेंच कल्याण होईल कांहीं;
वदे हेंच सर्वांस गर्जून वाचा,
पिता धन्य तो हिंदभू-जागृतीचा. ६

जगाच्या सुखा जन्म घेती विभूती;
स्वचारित्र्ययोगें करी सार्थ उक्ती;
ऋणी देश हा भक्तिभावें जयाचा,
पिता धन्य तो हिंदभू-जागृतीचा. ७

विवेकी, विरागी, सदा सत्यवादी
धरी दुःखवृद्धींतही साम्यबुद्धि;
असा जो जगीं बाळ गंगाधराचा
पिता धन्य तो हिंदभू-जागृतीचा. ८

———

( १५ )

## नक्षत्रास.



( चाल—जागिये रघुनाथ. )

चमक चमक नक्षत्रा ! सकलविभवशाली
तिमिर-शाल घे विशाल अवनी या काळीं ॥ ध्रु. ॥

विमल नील अतिविशाल—सोज्वल तें गगनभाल
त्यावरि तव दीप्तिगोल—करित ललित केली. १
अर्धस्फुट रुचिर सुमन—गगनश्रीचें भूषण
दिव्याची मूर्त खूण—असासि अंतराळीं. २
दिव्य ध्रुव पूर्ण असासि—भूत भव्य सर्व बघसि
स्वानंदा सेवितोसि—असशि भाग्यशाली. ३
तेजाचें शांतीचें—तूं निधान दिव्यांचें
सम्मीलन स्नेहाचें—तव ठायीं होई. ४
श्रेष्ठ असासि सृष्टींत—म्हणुनि तुजसि ठेवीत
उच्चस्थलिं गगनांत—तो प्रभु गिरिधारी. ५
तेजस्वी मुनिजन कुणि—रजतप्रभा वितरि गगनिं
होई प्लुत चैतन्यीं—शांत अंतराळीं. ६
रात्रिं रवे ! सूक्ष्मकाय—होउनि तूं बघसि काय
तिमिरपटालिं करित काय—अवनीं ही सारी. ७
तिमिरावृत ही अवनी—बघुनि होइ खेद मनीं
नक्षत्रा ! तव दर्शनिं—दृष्टि हो निराळी. ८
तिमिरपार द्युति अपार—साक्ष तुझी स्पष्ट थोर
त्यावरि जो ठेवि नजर—तोचि भाग्यशाली. ९
तव ठायीं मज नूतन—तेज दिसे रात्रंदिन
नक्षत्रा ! तव दर्शन—सुखकर तर भारी. १०
नक्षत्रा ! चमक चमक—भूलोक स्वर्लोक
करिती तव सतत कुतुक—विलस ईशभाळीं ! ११

———

( १६ )

## पंजरस्थ विहग.

( चाल—आनंदी आनंद० )

स्वातंत्र्याला मी मुकलों
बाह्य जगाला मी मेलों ।
पंजर माझें जग अवघें
पंजर आणी मी दोघे
जगांत उरलों,
सुखांत असलों,
तरिही मेलों
पराधीन मी जरि असलों
जिवंत असुनी परि मेलों ! १
सुखांत विपिनीं किती तरी
नित्य मधुर मी गान करीं.
स्वतंत्र फिरलों,
यथेच्छ रमलों,
दंग जाहलों
सखीसवें मी किति रमलों.
आज सुखा त्या, मी मेलों २
उंच गिरीवर दूरवरी
जाउनि, उडलों नभांतरीं
कधीं मंदिरीं,
कधीं कंदरीं
कधीं भूवरी
यथेच्छ हर्षें मी बसलों
स्वैरविहारा अजि मुकलों ! ३
दिव्य मनोहर उषःप्रभा
सृष्टीची खुलवी शोभा
फुलें उमलली,
सृष्टी नटली,
भ्रमरें लुटिली,
परका यांना मी झालों
सर्वस्वाला मी मुकलों. ४
नित्य जगा मीं रिझविलें
प्रेम तयें मजवरि केलें;
प्रेम परी तें
बंधन मातें
झालें पुरतें,
पराधीन जें करणारें
जळो प्रेम, विष तें सारें ५
जन हे सारे स्वार्थाचे,
नाहीं कोणी प्रेमाचें !
सौख्य निमालें,
भान हरपलें,
ज्ञान लोपलें,
दु:खपंजरीं मी पडलों
खऱ्या जीवना आजि मुकलों ६

(१७)

## फुलपांखरास.



(चाल—आनंदी आनंद.)

हिरव्या हिरव्या या कुरणीं–नाचत गुंगत गा गाणीं,
फुलवेली हीं रानफुलें–झुलतीं, घे त्यावरि झोले;
सुटे गंध, कुसुमें फुललीं–सद्गंधासह कर केली
कंटकयुत ती वेल जरी–कुसुमांहीं परि फुललेली;
जा कुसुमाच्या हृदयांत–प्रेमरसाचे घे घोट,
हृदयिं बिलगल्यावीण कदा–प्रेमबीज गवसे न बुधा ?
सुमहृदयींचें प्रेम गडे—उधळुनि दे तूं चोंहिंकडे
प्रेमरसें सुकली वेल—क्षणांत कुसुमित होईल
ऐकुनि गोड तुझें गान—वनदेवी कुतुहलपूर्ण
मुखावरिल अवगुंठन तें—रजत धुक्याचें सारीते
पंखावरि तव बसूनिया—स्वैर विहरते कुरणीं या
कुंपण कुरणा जरी असे—अटक तयाची तुला नसे
प्रभु तुज जग आंदण देई—अनियंत्रित तव विहारही
जड तनुचें बंधन जीवा—तोडुनि घे त्यासह धांवा
तया फूलपांखरासवें—कोमल किरणीं खेळावें.
गवतांतुनि जाळ्यांमधुनी—विहरावें, स्वच्छंद वनीं
इंद्रधनूवरि बैस तरी—दंवबिंदूंतिल, मौज खरी

सद्गंधामाजी भरुनी—खुशाल फिर रानोरानीं
स्वातंत्र्याचें सौख्य पहा—अनंतकालचि घेत रहा. १

लाभेल कां सुख मला फुलपांखराचें,
स्वच्छंद त्या उपवनीं विहरावयाचें ?
आकंठ तो मधु कधीं मज प्यावयातें
लाभेल रे वद सख्या फुलपांखरा ! तें. २

---

## ( १८ )

## चंद्रोदय.



[ चाल—चंद्रकांत राया० ]

नभःप्रांगणीं गोजिरवाणें चिमुकलेंच बाळ
प्राचीबाळा घेउन आली राजस लडिवाळ; १

छटा गुलाबी गोड किती ती दिसते मुखकमलीं;
किती बाळसेदार असें हें खुलतें स्मित गालीं. २

दृष्ट तयाला होइल ह्मणुनी लावी त्या तीट
निज नयनींचें काजळ काढुन लावि गालबोट— ३

रात्रीबाळेजवळीं दिधलें प्राचीबालेनें—
निजबाळातें, घेई त्यातें कुतुकें स्मितवदनें— ४

नक्षत्रांच्या दृष्टमण्याची मनमोहन माळ
शशिबाळाच्या गळा घालि तंव ती रात्रीबाळ. ५

बालक विलसे नीलनभीं तें ज्ञानकमळ जैसें—
विकारविरहित सज्जनमानससरोवरीं विलसे. ६

वनौषधींचा जीवनरस कीं हर्ष सागराचा,
प्रगटे गगनीं भाव मूर्त कीं प्रेमळ भक्ताचा. ७

भगवंताचा कौस्तुभमणि हा, मणि कीं शेषाचा
राधेनें वा नभीं उडविला चेंडू कृष्णाचा. ८

गगनश्रीच्या माथ्यावरचें हें पिंपळपान
निशादेविचें प्रकट होय कीं विशदांतःकरण ! ९

पतिव्रतेच्या पावित्र्याचें तेज असे काय !
पुण्यात्म्याची पुण्याई कीं नभीं प्रकट होय ! १०

गगनश्रीच्या सुकृताचें फळ मूर्त गगनिं आलें
नभीं उमटलें ईशाचें कीं शुभस्फुरण पहिलें ! ११

विश्वमोहिनी सरस्वतीची प्रतिभा कीं स्फुरली
प्रभा तियेची रम्य सुशीतल भूवरि अवतरली. १२

जादुगारिणी मायेच्या त्या रजनीजालास
घालविणारें ज्ञानतेज कीं उजळी आकाश. १३

सृष्टिदेवता निजानंद कीं शशिरूपें प्रकटी
आनंदाचा सेक करी त्या गमतें भूपृष्ठीं. १४

———

## ( १९ )

## रानफुलास.



चाल—चंद्रकांत०

प्रातःकाळीं जंव वनमाळी फुलें खुडायातें–
जाई, तंव तो पाही सुंदर रानफुला. त्यातें– १
वदे, " सुंदरा रानफुला, तूं रडसी कां व्यर्थ?
अश्रू नयनीं आले तव कां? कळे न मज अर्थ. २
बोल बोल तूं, सांगें मजला अंतरिंचें दुःख,
मी वनमाळी, रानफूल तूं, मजसि तुझें सख्य. ३
वेली डुलती, कमलें हंसतीं, कलिका फुलती या,
भृंग गुंजती, पक्षी गाती, उघडिं नयन राया. " ४
दीर्घ उसासा टाकुनि वदलें रानफूल त्यातें,
" हंसतों, फुलतों, डुलतों, परि नच गाइ कुणी मातें; ५
वृद्ध तरुण वा युवती बाळें कुणी न मज घेती,
न घेवोत, परि भृंग तेहि नच आदर मम करिती! ६
काय पाप मीं केलें इतुकें? सुंदर नच मी कां?
मनुजा कधितारि येइल माझें स्वरूप बघतां कां? ७
विश्वेशें ज्या मजला केलें, त्या मज, सारे हे
अवमानिति कां? फेंकुनि देती, कुस्करिती कां हे? ८
राहुनि राहुनि याच विषयिं मज दुःख फार होई.
कीं 'ईशकृता मज निजबंधुस गणिति न नर कांहीं'! ९

वदे फुला त्या वनमाळी तो, " स्वार्थी जन सारे
कार्य जोंवरी तोंवरि इतरां आदरिती बा रे; १०
गुलाब चंपक जाइजुई जन आनंदें घेती,
कार्य जाहल्यावरि बघ सारे फेंकुनिया देती ! ११
कुणि बाहेरी, कुणी गटारीं दुर्गंधीकूपीं
फेंकुनि देती, विरळा नर जो नदीतटीं अर्पी. १२
नको कष्टदा स्थिती अशी ही; याहुनि हें बरवें
जेथ रमावें तेथ मरावें, नरकीं कां जावें ! १३
तूं म्हणसी मज जन अवमानिति, अवमानुत सारे !
सुंदरता तव अवलोकाया चंद्र सूर्य तारे — १४
येति पहा हे, वायू गाई, कशास तुज भृंग
व्हावा ! तुजला पाहुनि झाला निर्झरही दंग. १५
महापुरुष हे पर्वत सारे कौतुक तव करिती,
हंसरें मुख तव बघुनी तरु हे माना डोलविती; १६
मर्त्य नराची स्तुती नको; हे अमर तुला गाती.
रात्रंदिन, भज वद यांत रे कोणाची महती ! १७
प्रेमळालसा जीवा तुझिया नवल नसे येथें !
प्रेमा तुजवरि करिती पाहीं पंचमहाभूतें. १८
पृथ्वीनें तुज जन्महि दिधला, जीवन जल देई,
प्रेमें तुजला कुरवाळी रवि, वायू अंगाई — १९
गाई, तुजवरि गगन धरी हें छत्र पहा कैसें !
निस्वार्थी तो प्रेमा यांचा, यावरि विश्वासें ! २०

तेजोराशी सहस्त्ररश्मी सूर्यातें जेणें
त्या आस्थेनें केलें तितुक्या तुजलाही तेणें २१
केलें. त्याचा प्रेमा तुजवरि अखंड तो आहे,
प्रेमा त्यावरि करीं फुला रे, निजतनु त्या वाहें." २२
रानफुला त्या पटलें सारें, हंसुनि वदे मग तें—
" सत्य बोलसी विरलें माझ्या मनिंचें दुःखहि तें. २३
मर्त्य नराची मर्त्य स्तुतिही, मर्त्य प्रेमा तो
नको नको, मी अखंड त्याचा प्रेमा मागें तो." २४

---

## २०
## माझें फूल.



( शार्दूलविक्रीडित )

माझें फूल असो कसेंहि, परि तें माझें मला आवडे,
आहे तें जरि गंधहीन अगवीं, सार्धेसुधें ही जरी;
सारीं तुच्छ फुलें जगांतिल मला माझ्या फुलाच्यापुढें,
यावज्जीव मदीय मात्र सुम मी ठेवीन या अंतरीं. १

नाना सुंदर गंधयुक्त सुमनें दृष्टीपुढें तीं नको !
रत्नें कांचन सर्व तुच्छ गणितों, आहेत सारीं फिकीं.
नक्षत्रें अवघीं, तसें अमृतही माझ्या न कामास ये;
माझें फूल असो कसेंहि, परि तें माझें मला आवडे ! २

निंदो हा जन, वा म्हणोहि मजला वेडापिसा कीं खुळा,
बोलो काय हवें तसें, न परवा विश्वीं कशाची मला.
जा, नाना सुमनांत गुंगत रहा, भृंगा! तुला योग्य तें.
माझें एकच तें पुरें सुम मला, सर्वस्व माझें मिळे; ३

जें प्रेमामृत मत्सुमांत भरलें, भोक्ता तयाचा असे,
गंधाकारमधुस्मिता भुलति जे, ते सर्व वेडेपिसे. ४

---

(२१)

## स्वयें मरण मी पाहें माझें, सार्थक जन्माचें झालें.

(चाल–किती रहावें.)

चंद्र पाहिला आजवरी मी परी सौख्य तो मला न दे;
अनंत तारा नभीं चमकती मला एकही शांति न दे.
चंद्र पावतो कधीं क्षया,
दिनकर येतां जात लया,
विलोल असती तारा या,
अक्षय अविरल असे प्रेम तव, अन्य मूर्ति मम मनीं न ये,
सुधा गोड जरि परी साम्यता तुझी कदा तिज न ये, सये! १

रूप मनोहर रम्य मयूरा मधुर नर्तनें भुलवि जना;
बसंत येतां सुभग कोकिळा मधुरालापें मोहि मना.

कर्णकटू रव परि त्याचा,
मोहक नच तो वर्ण तिचा,
तव ठायीं रूप-रवांचा,
संगम हृदयंगम गे ! झाला, तुच्छ पहा ते पिक-केकी,
सौख्य अनुभवी याच भवीं मी, अनुभविती जें सुर नाकीं. २

फुलें पाहुनी भुले कुणाचें मन, मधुरामृत कीं त्यांत—
असे; पुसे मी ' मरण तयानें सुखकर येई कां येथ ! '
प्रेमामृत मी जें प्यालों,
मीपणास तेणें मेलों;
स्वर्गा जिंकुनिया ठेलों.
पीयूष न विष मधु हें तेणें मरण मला सुखकर आलें;
स्वयें मरण मी पाहें माझें, सार्थक जन्माचें झालें. ३

---

## [ २२ ]
## जाळ्यांत अडकलेल्या हरिणीचे उद्गार.

[ द्रुतविलंबित ]

मृदुल कोमल हें तृण पाहुनी
अहह ! जाइ कसें मन मोहुनी !
अडकलें, मुकलें निजबालका
मजवरी रुसला करुणेश कां ! १

त्यजुनि वाट दुजी इकडे कशी
चुकुनि मी वळलें, पडलें फशीं !
बघुनि दुर्बळ, पाशहि टाकिले.
कपट, शूर जनां न असें, भलें. २
विकसल्या कुसुमासम पाडसें
बघुनिया सुख मानसिं होतसे;
अजुनि मास तया नच जाहला,
मम वियोगचि तो आजि त्याजला ! ३
जननिपासुनि बाळक तोडणें
विहित काय असे ? मज सांगणें !
मम तनूवर तें रमलें किती,
महिवरी जणूं निर्झर खेळती ! ४
बघुनि जें सुख मानसिं जाहलें,
जननिला सुख केवळ तें कळे.
स्तनिं पहा फुटलें मधु दुग्ध हें !
मम शिशूप्रति देइल कोण हें ? ५
कुणिकडे बघुं मी मम पाडसें ?
आजि कस जग निष्ठुर होतसे !
हृदयभेदक मी रव काढुनी
कळवळें, नच आणिति तें कुणी. ६
कवण दुग्ध तया आजि पाजिल ?
कवण जीवन त्याप्रति देईल ?

कवण देइल त्या जननीसुख ?
करिल कां कुणि हो कधिं कौतुक ? ७
त्यजुनि निष्ठुर मी आजि जातसें,
तव करीं, करुणाकर ! देतसें;
तुज पिताजननी वदती जन,
प्रभुवरा, करिं लालन-पालन ! ८
मम असू आजि घेतिल पारधी,
क्षणसुखास्तव, निर्दय हे कुधी;
जरि मिळे रसनासुख त्यांप्रती,
उचित कां मनुजा असली कृती ? ९
मनुज जो करि ही असली कृती,
अधम राक्षस तो खल दुर्मती;
म्हणति—हे करितों अबलावन,
परि निरागस मारिति हे जन ! १०
नच पुरे विधि-निर्मित भक्ष्य कां ?
हरिति जीवित हे म्हणुनीच कां ?
जगतिं भूतदया नच शब्द का ?
मनुज—उन्नति ही असलीच का ? ११
वसति खाद्य असे जरि वेगळें,
हरिति जीवित हे अमुचें बळें;
मधुर आमिष हे जरि दाविती,
फसविते नयना मधुराकृति. १२

घळघळां नयनांतुनि ये जळ,
त्वरित तों घुसला उदरीं शर;
कठिण तीव्र जरी शरवेदना,
परि मनीं शिशुदर्शनकामना. १३
हृदयभेदक काढुनियां रवा
विनवि ती-" मजला शिशु भेटवा!
मज घडो शिशुदर्शन शेवटीं!
चहुंकडे म्हणुनी नयनांप्रती— १४
गरगरां फिरवी, खर तों शिरे
शर दुजा नयनीं, तंव सत्वरें
नयन बाहिर ये, धरणीवरी
उपडि ती पडली मृगि सत्वरी! १५
नयनिं शर शिरे तों लोट बाहेर येई
हर! हर! रुधिराचा, प्रेम तें शुद्ध वाही!
त्वरित हरिणि गेली सोडुनी या जगाला.
वदतच वदनीं कीं-' भेटवा मच्छिशूला!' १६

---

## ( २३ )

## तुफान.

( दिंडी वृत्त. )

प्रबल वायूनें क्षुब्ध मही झाली,
सृष्टिसुंदरिची शांति लया गेली;

२३ तुफान.

तिमिर पसरे, रविबिंब लुप्त झालें
नभीं भीषण हे मेघ पहा आले ! १
मेघ गर्जे भेसूर हा घडाडा,
जणूं कडकड चावितो उग्र दाढा,
रजोधूसर जाहलें व्योम सारें,
घोर भीषणता बघुनि मन थरारे. २
क्रुद्ध चपला करितात या निनाद,
क्षणद्युतिनें त्या नेत्र दिपवितात.
भीति दाटे, लोपोनि धैर्य गेलें,
कडड कडडड हा नाद घोर चाले ! ३
विहग सारे तरुकोटरीं दडाले,
गान कसलें, भयचकित सर्व झाले,
क्रूर पशुही गिरिकंदरांत गेले,
कुठें दडले, तें भान सर्व गेलें ! ४
कसा झंझानिल तीव्र वाहताहे,
कसा सों–सों गर्जना करित आहे,
महावातें उन्मूल वृक्ष झाले
सृष्टि फिरवित झर्णि वातचक्र चाले. ५
घोर घूकांचा घूत्कार चाललाही
वाघुळांचा रव चिरर चिरर होई
मधुनि टिटवी भेसूर ओरडेही
श्वान साथी जाहले तिचे कांहीं. ६

बघुनि सैतानी नाच हिंदभूत
क्षुब्ध झालें तें जणों महाभूत !
येइ जलदासह, दाखवी तयातें*
विद्युदसिला कीं करुनि गर्जनेतें. ७

बाह्य सृष्टींतिल भेसुरता ग्रासी–
अंतरात्म्यातें, तयें हृदाकाशीं–
घोर पसरे नैराश्यतिमिर, झाला–
जीवलोकहि जणुं ग्रास तत्क्षुघेला ! ८

---

## ( २४ )

## कुठें ती भवानी तलवार ?

( चाल––वीरा अमरा. )

महाराष्ट्रभूचरणांतिल जड पारतंत्र्यशृंखला
तोडिली जिनें, कुठें चंचला
शिवा भवानी वीर्यशालिनी नाथ जिचा भूवरी
चमकला नक्षत्राच्यापरी !
जिला पाहतां कडेकपारीं दडती अरि जाउनी
घूक ते जेवीं रवि पाहुनी !
वीरश्री ती कुठें ? भागली करुनि पराक्रम अतां,

---

* सैतानास.

जाहली किंवा ती मूर्छिता ?
शिवरायस्वामी नाथ तिचा लोपतां,
लोपली तिची कां अपार ती दिव्यता ?
तिजयोग्य न राहे काय कुणी सर्वथा
वीर संप्रती ! म्हणुनि तिजप्रती विषाद तो येतसे
दडुनि ती म्यानीं राहातसे. १
रायगडीं त्या वीरगड्याच्या समाधींत ती दडे !
मृतासम भूवरि किंवा पडे ?
कुणि दुबळ्यानें दगडीं थडगें बांधुनिया तिजवरी
गाडिली का तेजोनिर्झरी ?
नरडीला नख तिच्या देउनी मातृघातकें कुणीं.
घेतलें इमान तें काढुनी ?
कीं तुळसीपत्रें तिला कुणीं वाहिलीं ?
कां कुणा भीरुनें अधर तिला टांगिली ?
कां पंढें तिज कुणिं परक्यावरिं घातली ?
पाकागारीं भीमासम वा राही अज्ञात ती
बिळीचें रूप घेउनी सती ? २
मातृभूमिच्या ऐश्वर्याची धुळधाणी जो करी
तया ती शोधी गिरिकंदरीं ?
नागिणिचा त्या स्वातंत्र्याचा मणी घेतला कुणी
हतप्रभ दडे विवरिं जाउनी.
मान हेंच धन मोठें गणुनी अपमानाचें जिणें

रुचेना वरिलें नमिं राहणें.
ती चपलारूपें राही मेघोदरीं.
तें तेज पूर्वींचें घेउनिया भूवरीं—
येईल गर्जना करीत काळापरी
परवशतेच्या भीष्माचा वध करील या भारतीं
असो द्या राष्ट्रधर्मि परि रति. ३

* * * *

तल्वार भवानी असे इमानी इनान अमुचें कुठें ?
संप्रतीं बंधु बंधुवर उठे !
चढे आमुच्या आलस्याचा गंज तिजवरी अतां
बोथटे धार तिची तत्वता.
देशभक्तिच्या म्यानाची अभिमान मोडिली स्वयें
लोपलें सत्व तियेचें तयें
तिज चढेल पाणी, स्वार्थ अम्हीं सोडितां.
दावील सत्व तीं, सत्व अम्हीं राखितां,
चमकेलचि, बंधुद्रोह दुरी लोटितां.
नव्या युगीं अवतार तिचा नव दिसेल या भारतीं
असो द्या निजधर्मीं परि रति. ४

———

## ( २५ )

## धर्माची हांक.

( चाल— तुतारीची )

धर्मरूप बलभीमावरि या
रूढीशेंदुर बहुत सांचला;
झांकितसे तज्जीवकलेला,
तेणें निष्क्रियता ये त्याला,
म्हणुनी म्हणती मृत कोणी त्या १
पूर्वज अपुले धन्य धन्य ते,
जपले प्राणांहुनि धर्मातें;
निधान अपणां त्यांहिं दिलें तें
वृथा उधळण्यासाठिंच कां तें ?
आर्यपुत्र हो वदा वदा तर. २
गतकालांतिल वैभव सुंदर
असेल संप्रति आणायाचें,
भाविकाळच्या संतानाचें
असेल हित जरि करावयाचें,
नव्या युगाचे हिंदी व्हा तर. ३
नव्या मताचे धर्मवीर हो !
धर्मस्वर्णीं चढलेलें किट
जाळा सगळें, द्या अग्नीपुट.
लोकभीति-भूतहि जें विकट
नाचे, हांसे, गाडा त्या हो. ४
पुराणकाळीं सद्धर्माचें
श्रुत्यमृत जें अक्षय शाश्वत,
स्मृतिकुंडांतुनि होतें वाहत,
कर्दमयुत तें[१] झालें सांप्रत,
धुवुनि खसखसा स्वच्छ करूं तें ५
देव राहतो देवघरांत,
सैतानाचि कां तो इतरत्र ?
द्वैती दृष्टी अमुची मात्र,
अनुस्यूत जरि तो सर्वत्र
असे, तरी नच आम्हां दिसत ! ६
देवा विसरुनि देव्हाऱ्याची
पूजा करतां, सत्य मावळे,
मंत्र बोधले, तंत्र वाढलें,
यथासांग तें कर्म लोपलें,
उलटचि झाली रीत जगाची ! ७
चार वर्ण, परि सहस्र जाती !
पंथ शेंकडों तयां न गणना !
जो तो द्वैता वाढवि जाणा,

---

१ तें स्मृतिकुंड.

नित्य करी जरि धर्म गर्जना,
' ऐशानें कां श्रेयःप्राप्ति?' ८
विराट पुरुषाचे अवयव जे
शूद्र, तयां तुम्हि दूर लोटितां,
तदर्धांग जी स्त्री तिज गाणितां
' पापयोनि ' परि, ही कां समता?
अशानेंच बळ कमती तुमचें! ९
वैश्य जाहले अडते सगळे,
क्षत्रिय संप्रति बंधु तुडविती,
रक्षण कैचें? भक्षण करिती!
मुकुटमणी जे ब्राम्हण असती
पायधुळींतच लोळत पडले! १०
त्रैलोक्याच्या कल्याणास्तव
भूसुर ऋषिवर दधीचिनेंही
देह अर्पिला, तदा वृत्रही
झाला मृत, तशि तापमुक्त मही.
अजुनी करिती सुरवर तत्स्तव! ११
तपोबलें ज्या ऋषिवर्यांही
भूमींतच या विक्रम केले,
वंशज त्यांचे झालों दुबळे,
स्वार्थी विकलों केवळ सगळे!
धर्म बुडाला वदती कांहीं. १२

धर्मसूत्रिं जी वर्णसुमांची
माला सुंदर ग्रथिली होती,
अनवस्थेनें त्रुटित होय ती;
व्हाया शाश्वत श्रेयःप्राप्ति
माला पुनरुपि करुं सुमनांची. १३

आर्यबंधुहो! हिंदुब्रुव हो!
" जाऊं बघतें नांव लयाप्रत,
कुत्रा हाल न खाई सांप्रत "*
धर्म मिळवूं निजपद उन्नत;
हांकेला या जबाब द्या हो! १४

धर्मवीर हो! या या पुढती,
असेल गौरव आर्यभूमिचा
तुम्हां जगीं जरि राखायाचा,
चोखाळुनि पथ ऋषिसंतांचा
धर्मोद्धारा झटा निरंतर! १५

---

* या दोन ओळी कै. केशवसुतांच्या ' तुतारी 'तील आहेत.

(२६)

## अभंग.

१

नको प्रेम मज मर्त्य मानवाचें–कोण भिकाऱ्याचें प्रेम वांछी ? १
थोरापाशीं भीक स्वयेंचि जो मागे–तयाच्या मी मागें जाईन कां ? २
नरापाशीं करूं प्रेमाची याचना ?–मनाची वंचना करूनीया ? ३
तुष्ट होतां नर, देईल तो काय ?–मनस्ताप जाय जेणें माझा ! ४
नित्य हांजी हांजी याचना देवाची–करीन, तयाची कृपा व्हाया. ५
प्रभूच्या कृपेनें तिन्हीही लोकींचें–मिळे सौख्य साचें सर्वकाळ. ६
बाळ म्हणे नरा ! तुझें प्रेम पुरे–मनाचें भिर्भिरें थांबलें हें ! ७

२

गेलें आवरण, सांपडे चरण–येवोंदे मरण, सुखें आतां. १
जगा, जा जा वेगें, नको लागूं मागें–जीव हा बिलगे प्रभुपायीं. २
मातेच्या स्तनासी बिलगल्या बाळ–कोण तो चांडाळ ओढील त्या ? ३
रंगलें हें मन रंगनाथापायीं–जगा ! त्या कदाही ओढूं नको. ४
माय पदरानें लेंकरू झांकीतें–अंगावरी पितें जेव्हां तें हो, ५
कृपेचा पदर घालीं मजवरी–तैसा हे मुरारी, विनवितों. ६
बाळ म्हणे तरी होईल सार्थक–नातरी वाहक प्रेताचा हा. ७

---





मत्कवनसलिलबिंदू सहज पडुनि रसिककर्णशुक्तींत,
चिर शुचि मौक्तिकरूपें शोभुत सद्रत्नकाव्यपंक्तींत.

